महसूली कार्यालयांच्या कार्यक्षेत्रात फेरबदल/ नवीन कार्यालय निर्मिती व महसूली कायद्यांमध्ये आवश्यकतेनुसार बदलांबाबत शिफारशी करण्याकरीता गठित समितीस मुदतवाढ देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः प्राफेब - २०२३/ प्र.क्र.१०६ /म-१०**

पहिला मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई.
तारीख: १५ मार्च,२०२४

**वाचा:-** १. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.प्राफेब-२०२३/प्र.क्र.१०६/म-१०, दि.२५.१०.२०२३

२. शासन पुरकपत्र, महसूल व वन विभाग क्र.प्राफेब-२०२३/प्र.क्र.१०६/म-१०, दि.२२.११.२०२३

३. उपायुक्त (सामान्य प्रशासन) तथा समिती सदस्य सचिव, महसूली कार्यालये पुनर्रचना व महसूली कायदे सुधारणा समिती २०२३, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांचे पत्र क्र.म.का.सु.स.२०२३/कावि-०२/५०/२०२४, दि.२२.०२.२०२४

**शासन परिपत्रक:-**

राज्यातील महसूली कार्यालयांच्या कार्यक्षेत्रात फेरबदल/ नवीन कार्यालय निर्मिती व महत्वाच्या महसूली कायद्यांमध्ये आवश्यकतेनुसार बदलांबाबत शिफारशी करण्याकरीता श्री.उमाकांत दांगट, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या अध्यक्षतेखाली सेवानिवृत्त भारतीय प्रशासकीय सेवेतील व इतर अधिका-यांची समिती वाचा क्र.१ येथील दि.२५.१०.२०२३ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली असून या समितीस ९० दिवसांच्या आत अहवाल सादर करण्याविषयी निर्देशीत करण्यात आले आहे. वाचा क्र.२ येथील दि.२२.११.२०२३ च्या पुरकपत्रान्वये सदर समितीमध्ये ३ अतिरिक्त सदस्यांचा व समितीच्या कार्यकक्षेत २ अतिरिक्त विषयांचा समावेश करण्यात आला आहे.

आता, सदर समितीचे कामकाज व कामकाजाचा आवाका विचारात घेता समितीस ६ महिन्यांची मुदतवाढ देण्याची वाचा क्र.३ येथील दि.२२.०२.२०२४ च्या पत्रान्वये विनंती करण्यात आली आहे.

त्यानुसार याप्रकरणी श्री.उमाकांत दांगट, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या अध्यक्षतेखालील समितीने केलेली विनंती, समितीकडे सोपविलेल्या सर्व विषयांची व्याप्ती व समिती गठित

केल्यानंतर समितीच्या कार्यकक्षेत समाविष्ट केलेले अतिरिक्त विषय इ.बाबी विचारात घेता सदर समितीस शासनास अहवाल सादर करण्याकरीता दि.२५.०७.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५११५१०५६५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2024.03.15 12:00:49 +05'30'

**( संतोष वि.गावडे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव,विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१५. सर्व विभागीय आयुक्त.
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. सर्व उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय.
१८. समितीतील सर्व सदस्य. (विभागीय आयुक्त, पुणे यांच्यामार्फत)
१९. उप आयुक्त (सा.प्र.) पुणे विभाग, पुणे.
२०. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बराक नं. १, नरिमन पॉईंट, मुंबई.
२१. भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(इं) समिती, टिळक भवन, दादर, मुंबई.

२२. राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे. एन. हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई.

२३. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई.

२४. बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी. भवन, भूखंड क्र. ८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई.

२५. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल मार्ग, मुंबई.

२६. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस,वरळी, मुंबई.

२७. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई.

२८. प्रहार जनशक्ती पक्ष कार्यालय, सीडीओ बॅरेक क्र.१० मधील कक्ष क्र.०१ व ०२, योगक्षेमसमोर, जीवन बीमा मार्ग, चर्चगेट, मुंबई.

२९. सर्व सह सचिव/ उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३०. निवडनस्ती (कार्यासन म-१०).